# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन ज्ञापन क्रमांक- दुरुस्ती-०७१७/प्र.क्र.४४५/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक ३१ जुलै २०१७.

**विषय** :- पोलीस कर्मचारी वसाहत, धर्माबाद, तालुका-धर्माबाद, जिल्हा-नांदेड, येथील १६ निवासस्थानांची दुरुस्तीची कामे करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**संदर्भ** :-

1) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.
2) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ १३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
3) पोलीसं महासंचालक, महाराष्ट्र राज्य, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोमसं/ २७-बी-२/ दुरुस्ती-कार्यक्रम-आढावा/ ३७१/२००९, दिनांक ३१.०७.२०१७.

**ज्ञापन** :-

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, यांनी पोलीस कर्मचारी वसाहत, धर्माबाद, तालुका-धर्माबाद, जिल्हा-नांदेड, येथील १६ निवासस्थानांची दुरुस्तीची कामे करण्याचा प्रस्ताव सादर केला आहे.

२. उक्त कामासाठी उप-विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, धर्माबाद, यांनी सन २०१६-१७ च्या जिल्हा दरसूचीनुसार तयार केलेले **रु.४२.५६ लक्ष** इतक्या खर्चाचे अंदाज सादर केले आहे. उक्त खर्चाचे अंदाज कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, भोकर, जिल्हा-नांदेड, यांनी साक्षांकित केले आहेत.

३. उक्त खर्चाचे अंदाज सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी तपासले आहेत व ते **रु.४६,३४,८०४/-** असे सुधारित केले आहेत आणि प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दिली आहे.

४. त्या अनुसार, पोलीस कर्मचारी वसाहत, धर्माबाद, तालुका-धर्माबाद, जिल्हा-नांदेड, येथील १६ निवासस्थानांची, पोलीसं महासंचालक यांच्या कार्यालयाच्या संदर्भाधीन पत्रासोबत सादर करण्यात आलेल्या प्रस्तावात उल्लेख केलेली, दुरुस्तीची कामे करण्याकरिता **रु.४६,३४,८०४/-** इतक्या खर्चाच्या अंदाजास, *(१)* निधी उपलब्ध झाल्याशिवाय कामास सुरुवात करु नये आणि *(२)* पोलीस अधीक्षक, नांदेड, यांनी उक्त खर्चाचे अंदाज स्वाक्षारीत करावे या अटींवर, याद्वारे, प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**५.** उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग-मागणी क्र. बी-१, २०५५, पोलीस, (००) १०९, जिल्हा पोलीस, (००) (००)(०१) जिल्हा पोलीस बल, *दत्तमत* (२०५५ ०१६८), २७, लहान बांधकामे, या लेखाशीर्षाखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**६.** हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.६२६/इमा-२, दिनांक ३१.०७.२०१७, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०७३११८००५९२०२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.07.31 18:06:22 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रत :-**

१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
३) विशेष पोलीस महानिरीक्षक, औरंगाबाद.
४) पोलीस अधीक्षक, नांदेड.
५) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, नांदेड *(सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय. यांनी दिलेल्या "General Abstract" च्या प्रतीसह).*
६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, भोकर *(सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय. यांनी दिलेल्या "General Abstract" च्या प्रतीसह).*
७) जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड.
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
९) निवड फाईल (पोल-७).